GR 200407191323321001-2500

**महिला व बाल विकास विभागाच्या योजना जिल्हा परिषदेकडे वर्ग करण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- एमबीएस २००० / प्र.क्र. ३५३ / का.२
नवीन प्रशासन भवन,३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई ३२.
दि.२० ऑक्टोबर,२०००

शासन निर्णय :- महिला व बाल विकास विभागातील खालील योजना महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम,१९६१ च्या कलम १०० खाली जिल्हा परिषदेकडे दि. २.१०.२००० पासुन शासन अधिसूचना क्र. एमबीएस २००० / प्र.क्र. ३५३ / का.२, दि.१९ ऑक्टोबर,२००० अन्वये हस्तांतरीत करण्यात आल्या आहेत.

१. व्यावसायिक प्रशिक्षणासाठी मुलींना विद्यावेतन.
२. स्वयंरोजगार योजनेखाली स्त्रियांना व्यक्तिगत अनुदान.
३. निराश्रित विधवांच्या मुलींसाठी विवाह अनुदान.
४. कामधेनू योजना.
५. देवदासींना निर्वाह अनुदान.
६. देवदासी किंवा तिच्या मुलींच्या विवाहासाठी अनुदान.
७. देवदासींच्या मुला-मुलींकरीता शिक्षणाकरीता मदत होण्यासाठी गणवेशांचे दोन संच व लेखन साहित्य पुरविणे.
८. देवदासींसाठी बीज भांडवल योजना.
९. महिला मंडळांना प्रशिक्षण केंद्र चालविण्यासाठी अनुदान.
१०. राष्ट्रीय शिशुकक्ष निधी अंतर्गत पाळणाघर योजना.

२. वर नमूद केलेल्या योजना दि.२.१०.२०००० पासून ग्रामीण भागातील लाभधारकांसाठी जिल्हा परिषदेमार्फत राबविण्यात येतील व नागरी भागातील लाभधारकांसाठी आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत राबविण्यात येतील.

३. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे - १ यांनी वरील

योजनेमधील ग्रामीण लाभाधारकांसाठी दि.२.१०.२००० ते ३१.३.२००१ पर्यंतच्या कालावधीकरीता आवश्यक असणारी तरतूद जिल्हा परिषद निहाय सर्व मुख्य कार्यकारी अधिका-यांना कळवाव्यात. या तरतूदीतून या कालावधीतील खर्चाची देयके जिल्हा परिषदेच्या महिला व बाल विकास अधिका-यांनी कोषागारातून आहरीत करावीत. या प्रयोजनासाठी जिल्हा परिषदेमधील महिला व बाल विकास अधिका-यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वरील प्रमाणे कोषागारातून काढण्यात आलेल्या रकमांच्या खर्चाची मासिक विवरणपत्रे जिल्हा परिषदेच्या महिला व बाल विकास अधिका-यांनी संबंधित लेखाशिर्षाच्या तपशीलासह व प्रमाणक क्र. व दिनांकासह आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे १, यांनी पाठवावीत. त्यानुसार आयुक्त, महिला व बाल विकास यांनी या खर्चाच्या ताळमेळाची कार्यवाही पार पाडावी.

५. हा खर्च चालू वित्तिय वर्षात जरी जिल्हा परिषदेच्या नियमित लेख्यात समाविष्ट होणार नसला तरी या जमाखर्चाची माहिती मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी संकलीत करुन मुख्य कार्यकारी अधिकारी व महिला व बाल विकास समित्यांच्या निदर्शनास आणावी.

६. जिल्हा परिषदेमार्फत या योजना कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक त्या मान्यता जिल्हा परिषद अधिनियमास अनुसरुन सक्षम प्राधिकरणाकडून घेण्यात यावी व त्यासाठी मान्यता घेण्याची कार्यपदधत महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या लेखा संहिता १९६८ प्रमाणे राहील. ही कार्यपदधती दि. २.१०.२००० पासुनच्या आर्थिक व्यवहारास लागू राहील.

७. दिनांक २.१०.२००० ते ३१.३.२००० या कालावधीसाठी सध्याची शासकीय कार्यालयांमध्ये लागू असलेली लेखा परीक्षणाची कार्यपदधत चालू राहील.

८. सन २००१ ते २००२ च्या अर्थसंकल्पात या योजनांसाठी ग्रामीण भागातील लाभधारकांसाठीची तरतूद स्थानिक क्षेत्राच्या ( जिल्हा परिषदेच्या लेखाशीर्षाखाली ) करण्यात यावी व नागरी भागातील लाभधारकांसाठीची तरतूद सध्याच्याच लेखाशीर्षाखाली करण्यात यावी.

९. सन २००१ - २००२ च्या अर्थसंकल्पात हस्तांतरीत करण्यात आलेल्या योजनांसाठी ग्रामीण भागातील लाभधारकांसाठी जिल्हा परिषदेच्या लेखाशिर्षाखाली व नागरी भागातील लाभधारकांसाठी सध्याच्या लेखा शीर्षाखाली उचित तरतूद करण्याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तसेच या विभागाच्या अर्थसंकल्प कार्यासनाने आणि ग्राम विकास विभागाने घ्यावी.

१०. चालू वित्तिय वर्षाचा खर्च संबंधित योजनांच्या सध्याच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व मंजूर तरतूदीतून भागवावा.

११. वर नमूद केलल्या सर्व आदेशांचे सर्व संबंधितांनी पालन करावे. तसेच ग्राम विकास व जलसंधारण विभागाने शा.नि.क्र. जिपयो १० / २००० / प्र.क्र. ११३ / ४७, दि. २८.९.२००० अन्वये दिलेल्या सूचनांचेही सर्व संबंधितांनी पालन करावे.

हा शासन निर्णय ग्राम विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नायाने.

( चंद्रसेन तुरकर )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा. राज्यपांल याचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री / राज्यमंत्री ( सर्व ),
मा.मुख्य सचिव.
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

महालेखापाल महाराष्ट्र १ /२ ( लेखा परिक्षण ) मुंबई / नागपूर.
महालेखापाल महाराष्ट्र १ /२ ( लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई . वाशी .
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई .
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग )
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
निवड नस्ती, का-२